**महाराष्ट्र कुपोषणमुक्त करण्यासाठी राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम अभियान राबविण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०११/प्र.क्र.३००/कार्यासन-५**
**नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांकः २६/०९/२०११.**

**१) प्रस्तावनाः**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनांतर्गत ६ वर्षाखालील मुलांचे पोषण व आरोग्य स्थितीत सुधारणा करणे आणि बालमृत्यू रोखण्यासाठी १) लसीकरण, २) आरोग्य तपासणी, ३) संदर्भसेवा, ४) पूरक पोषण आहार, ५)महिलांचे आरोग्य व पोषण आणि ६) पूर्व प्राथमिक शिक्षण इत्यादी सेवा देण्यात येतात. यासाठी महिला व बाल विकास विभाग व सार्वजनिक आरोग्य विभागाची यंत्रणा काम करते.

राज्यात ग्रामीण जिल्ह्यांमध्ये ७८,९०२ अंगणवाडी केंद्रातून व ९,२७७ मिनी अंगणवाडी केंद्रातून ० ते ६ वयोगटातील बालके, गरोदर माता व स्तनदा माता यांना या सेवा पुरविण्यात येतात. आजही राज्यात कुपोषित मुलांची मोठ्या प्रमाणात संख्या दिसून येते. जून २०११ च्या मासिक अहवालानुसार राज्यातील ग्रामीण क्षेत्रात ९,७३,६६७ एवढी बालके मध्यम कमी वजनाची (MUW) असून १,२६,२४० एवढी बालके तीव्र कमी वजनाची (SUW)आहेत. **MAM (सौम्य कुपोषीत)आणि SAM (तीव्र कुपोषीत) बालके MUW (मध्यम कमी वजनाची) आणि SUW (तीव्र कमी वजनाची) मधीलच असतात, त्यामुळे MUW आणि SUW ची मुले सामान्य श्रेणीत आणल्यावर MAM आणि SAM मुले शिल्लक राहणार नाहीत.** राज्यातील ग्रामीण क्षेत्रात (आदिवासी क्षेत्र वगळून) कमी वजनाच्या मुलांचे सरासरी प्रति अंगणवाडी प्रमाण १२ पेक्षा सुध्दा कमी आहे. तर आदिवासी क्षेत्रासाठी कमी वजनाच्या मुलांचे प्रमाण अधिक असून ते प्रति अंगणवाडी १६ येते.

सध्या राज्यात सर्व बालके साधारण श्रेणीत (Normal) असलेल्या गावांचे प्रमाण कमी आहे. त्याची निश्चित संख्या जरी उपलब्ध नसली तरी धारणी प्रकल्पामध्ये १५% अंगणवाड्या कुपोषण मुक्त असल्याबद्दल सांगितले गेले. त्याचप्रमाणे अहमदनगर जिल्ह्यामध्ये साधारण २०% गावे सर्व बालके साधारण श्रेणीत (Normal) असल्याचे सांगितले जाते. ही सर्व माहिती एवढयासाठी देण्यात येत आहे की, योग्य प्रयत्न केल्यास मोठया प्रमाणावर गावे कुपोषण मुक्त होणे शक्य आहे. याच पध्दतीने संपूर्ण महाराष्ट्र राज्य कुपोषण मुक्त होणे शक्य आहे.

बाल्यावस्था हा मुलांच्या वाढीच्या व विकासाच्या टप्प्यातील अत्यंत महत्वाचा कालावधी आहे. बाळ जन्माला येण्यापूर्वी तसेच जन्मानंतर सुध्दा बालकांना आवश्यक सेवा देण्याचे धोरण शासनाने स्विकारले आहे. या सेवा देत असताना लोकसहभाग अतिशय महत्वाचा आहे. यासाठी गावपातळीवरील विविध संस्थांचा सहभागही अतिशय महत्वाचा आहे. गांव पातळीवरील सर्व कुटुंबांनी एकत्रीत येऊन लोकांच्या सहभागातून प्रयत्न केल्यास एकात्मिक बाल विकास सेवा योजना व आरोग्य विषयक कार्यक्रम यांची प्रभावी अंमलबजावणी होऊन महाराष्ट्र कुपोषण मुक्त करण्यास मदत होईल. यासाठी गांव पातळीवरील काम करणाऱ्या व्यक्ती, संस्था विशेषतः अंगणवाडी व ग्रामपंचायत यांना प्रोत्साहन देण्याची गरज आहे. यासाठी **कुपोषणमुक्त ग्राम ही संकल्पना अभियानाच्या माध्यमातून स्व-स्पर्धा पध्दतीने राबविण्याची बाब** शासनाच्या विचाराधीन होती.

**कुपोषण मुक्त ग्राम संकल्पनेच्या धरतीवर कुपोषण मुक्त शहर संकल्पना अभियानाच्या माध्यमातुन राबवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.**

**२) शासन निर्णयः**

महाराष्ट्र राज्यातील ० ते ६ वर्षे वयोगटातील बालकांचे कुपोषण दुर करण्यासाठी **राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम अभियान राष्ट्रीय बाल दिन (दि.१४ नोव्हेंबर, २०११) ते जागतिक आरोग्य दिन (७ एप्रिल २०१२) या कालावधीत राबविण्याचा शासनाने निर्णय** घेतला आहे. हे अभियान राज्यातील **सर्व ग्रामीण ३३ जिल्ह्यात** राबविण्यात येणार आहे.

राजमाता जिजाऊ कुपोषण मुक्त ग्राम अभियान राबवितांना त्याची दोन भागात विभागणी करण्यात येत आहे. पहिल्या भागात सर्व संबंधीत भागधारकांची जाणीव जागृती करणे गरजेचे आहे, तर दुसऱ्या भागात प्रत्यक्षात कुपोषणमुक्तीसाठी आवश्यक कृती करण्यात येईल.

**३) अभियानाची उद्दिष्टेः**

१. महाराष्ट्र राज्य कुपोषणमुक्त करणे अर्थात राज्यातील ० ते ६ वर्षे वयोगटातील सर्व बालके साधारण (Normal) श्रेणीत आणणे.
२. स्थानिक स्वराज्य संस्था जसे - ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद यांचा सक्रिय सहभाग वाढवून कुपोषणमुक्त ग्राम संकल्पना प्रत्यक्षात उतरविणे.
३. शाश्वत कुपोषणमुक्तीसाठी लोकसहभागास प्रोत्साहन देऊन समाजाच्या सर्व घटकांना या विषयाशी जोडून एक लोकचळवळ उभी करणे.

उपरोक्त उदिष्टे साध्य करण्यासाठी राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम अभियान लोकसहभागाव्दारे राबवितांना समाजामध्ये कुपोषणाबाबत माहिती, शिक्षण व संवादाचे विविध उपक्रमांव्दारे जाणीवजागृती निर्माण करणे, सर्व भागधारकांची क्षमता बांधणी करणे या बाबींवर भर देण्यात येणार आहे. सदर अभियान गतिमान करण्यासाठी **कुपोषणमुक्तीच्या स्व-स्पर्धेव्दारे गावांना राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम पुरस्कार देण्यात येईल.**

**४) राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम पुरस्कारः**

अशाप्रकारे दि.१४ नोव्हेंबर २०११ ते दि.७ एप्रिल, २०१२ या कालावधीमध्ये राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम अभियान राबविण्यात आल्यानंतर कुपोषणमुक्त झालेल्या गावांना राजामाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम पुरस्काराने गौरविण्यात येईल.

राज्यातील ३३ ग्रामीण जिल्ह्यांतील निकष पुर्ण करणाऱ्या सर्व गावांची पारितोषीकांसाठी निवड करण्यांत येईल. कुपोषण मुक्त गाव पुरस्कार योजनेसाठी निवडण्यात आलेल्या **ग्रामीण क्षेत्रातील** (आदिवासी क्षेत्र वगळून) **गावांना कुपोषणमुक्त गावासाठी रु.१००० + रु.१०० प्रत्येक मुलांस साधारण श्रेणीमध्ये आणल्याबद्दल बक्षीस देण्यात येईल.** तसेच **आदिवासी क्षेत्रातील गावांना कुपोषणमुक्त गावासाठी रु.१०,००० + रु.२०० प्रत्येक मुलास साधारण श्रेणीमध्ये आणल्याबद्दल बक्षिस** देण्यात येईल.

ज्या **आदिवासी गावांनी उल्लेखनिय कार्य केले आहे परंतू १००% यश मिळविणे शक्य झालेले नाही अशा आदिवासी गावांसाठी प्रोत्साहनपर बक्षीस योजना** पुढे दिलेल्या तक्त्याप्रमाणे राहील.

| अ.क्र. | उदिष्ट | करावयाचे साध्य | प्राप्त होणारे बक्षीस |
| --- | --- | --- | --- |
| १ | जर आदिवासी गावात अभियान कालावधीत एकूण बालकांपैकी २० किंवा त्यापेक्षा कमी बालके साधारण (Normal) बालकांच्या व्यतिरिक्त असतील तर | अभियान कालावधीत सर्व २० किंवा त्यापेक्षा कमी असलेली सर्व बालके साधारण श्रेणीत आणल्यास. | रु.१०,००० + रु.२०० प्रत्येक बालकास साधारण श्रेणीमध्ये आणण्यासाठी |
| २ | जर आदिवासी गावात अभियान कालावधीत एकूण बालकांपैकी २० ते ४० बालके साधारण (Normal) बालकांच्या व्यतिरिक्त असतील तर | अभियान कालावधीत २० बालके + उर्वरित बालकांच्या ७५% बालके साधारण श्रेणीत आणल्यास. | रु.७,५०० + रु.२०० प्रत्येक बालकास साधारण श्रेणीमध्ये आणण्यासाठी |
| ३ | जर आदिवासी गावात अभियान कालावधीत एकूण बालकांपैकी ४० किंवा त्यापेक्षा जास्त बालके साधारण (Normal) बालकांच्या व्यतिरिक्त असतील तर | अभियान कालावधीत ३५ बालके + उर्वरीत बालकांच्या ५०% बालके साधारण श्रेणीत आणल्यास. | रु.५,००० + रु.२०० प्रत्येक बालकास साधारण श्रेणीमध्ये आणण्यासाठी |

सदरहू पुरस्काराच्या रक्कमेच्या विनियोगाबाबत ग्रामसभेत निर्णय घेण्यात यावा. गाव कुपोषणमुक्त करण्यासाठी गावास वर नमूद केल्याप्रमाणे पुरस्कार व सहभागी झालेल्या सर्व संबंधीत अंगणवाडी सेविका, आरोग्य सेविका, मतदनीस, महिला बचतगट प्रतिनिधी, ग्रामसेवक, प्रशिक्षित दाई व सरपंच यांना गौरव प्रमाणपत्र **दि.१ मे २०१२ या महाराष्ट्र दिनी पालक मंत्र्यांच्या हस्ते देण्यात येऊन त्यांचा गौरव** करण्यात येईल.

याशिवाय प्रत्येक जिल्ह्यातून या अभियानात सर्वोत्कृष्ट काम करणाऱ्या पहिल्या ३ गावांना पुढीलप्रमाणे राजमाता जिजाऊ सर्वोत्कृष्ट कुपोषणमुक्त ग्राम पुरस्कार देण्यात येतील.

- जिल्ह्यात प्रथम क्रमांक रु.१ लाख व प्रमाणपत्र
- जिल्ह्यात द्वितीय क्रमांक रु.५० हजार व प्रमाणपत्र
- जिल्ह्यात तृतिय क्रमांक रु.२५ हजार व प्रमाणपत्र

तसेच कुपोषणमुक्त प्रकल्प, कुपोषणमुक्त तालुका, कुपोषणमुक्त जिल्हा व कुपोषणमुक्त महसुल विभाग यांनाही आकर्षक पुरस्कार देण्यात येतील.

ह्या पुरस्कारांचे वितरण राज्यस्तरीय कार्यक्रमातून सोयीप्रमाणे करण्यात येईल.

**५) पुरस्काराचे निकषः**

गावातील ० ते ६ वर्षे वयोगटातील कुपोषीत बालकांची संख्या शुन्यावर आणणे म्हणजेच **० ते ६ वर्षे वयोगटातील सर्व बालके साधारण श्रेणीत असणे हा एकमेव निकष** पुरस्कारासाठी राहणार आहे. अभियानाचे हे प्रथम वर्ष असल्यानेच हा एकमेव निकष ठेवण्यात आला आहे.

विविध अभ्यासावरुन असे दिसून आले आहे की, मातेच्या गर्भधारणेपासून (-९ महिने) ते बाळाच्या २४ महिने वयापर्यंत योग्य पध्दतीने काळजी घेतली नाही तर, ही बालके मोठ्या प्रमाणात मध्यम किंवा तीव्र कमी वजन गटात जातात. बाळाची शारिरीक वाढ, मेंदूची वाढ व विकास याच कालावधीत जास्तीत जास्त होतो. यासाठी -९ महिने ते २४ महिने या वयोगटातील बालकांच्या पोषणावर लक्ष केंद्रीत केल्याने एकही बालक कमी वजनाचे जन्मनार नाही, तसेच मध्यम किंवा तीव्र कमी वजनगटामध्ये जाणार नाही. त्यासाठी **परिशिष्ट-अ** प्रमाणे उपाययोजना कराव्यात.

पुढील वर्षापासून **अभियान कालावधीत जन्मतः कमी वजनाची बालके जन्माला येण्याचे प्रमाण शून्य असणे, माता मृत्यू, बालमृत्यू व अर्भकमृत्यू न होणे, १९ वर्षापर्यंत गरोदर माता नसणे, गरोदर मातांचे हिमोग्लोबीनचे प्रमाण मापदंडाप्रमाणे असणे, सर्व गरोदर मातांची संस्थात्मक प्रसुती होणे, इ.** सारखे सखोल निकष ठेवण्यात येतील.

### ६) राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम अभियानः

**अ) अभियानाची पुर्वतयारी :**

राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम अभियान राबविण्यासाठीची **पुर्वतयारी राज्यपातळीवरुन दि.०२ ऑक्टोबर, २०११ महात्मा गांधी जयंती दिनी सुरु करण्यात येऊन ती गावपातळी व लाभार्थी पातळीवर दि.१४ नोव्हेंबर २०११ या बालदिना पर्यंत नेण्यात येईल.** याद्वारे कुपोषण मुक्तीसाठी प्रत्येक विभागाची व त्यातील कर्मचाऱ्यांची जबाबदारी कशी राहणार आहे याचे मार्गदर्शन करण्यात येऊन त्याअनुषंगाने लागणारे तांत्रिक ज्ञान व अभियानात करावयाची कार्यवाही याबाबत माहिती दिली जाईल.

- **अभियानाचा औपचारिक शुभारंभ :**

**दि. ०२ ऑक्टोबर, २०११ रोजी महाराष्ट्राचे मा.मुख्यमंत्री, मा.उप मुख्यमंत्री, मा.मंत्री, महिला व बाल विकास, मा. राज्यमंत्री, महिला व बाल विकास व मा. मुख्य सचिव यांच्या उपस्थितीत राज्यस्तरीय कार्यशाळेचे** आयोजन करुन त्याद्वारे सर्व विभागीय आयुक्त, जिल्हा परिषद अध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी यांना राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम अभियानाबाबत मार्गदर्शन केले जाईल.

- **विभागीय कार्यशाळाः**

**दि.१२ ऑक्टोबर, २०११ पर्यंत राज्यातील सर्व विभागांमध्ये** महिला व बाल विकास विभागाचे मा.मंत्री, मा.राज्य मंत्री व प्रधान सचिव, तसेच आरोग्य विभागाचे मा.मंत्री, मा.राज्य मंत्री व अतिरिक्त मुख्य सचिव, महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, मिशन संचालक, NRHM, आयुक्त, महिला व बाल विकास यांच्या उपस्थितीत **विभागीय कार्यशाळांचे आयोजन** करुन त्याव्दारे विभागातील सर्व जिल्हयांचे जिल्हा परिषद अध्यक्ष, उपाध्यक्ष, महिला व बाल कल्याण सभापती, आरोग्य सभापती, जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल विकास), जिल्हा आरोग्य अधिकारी, उपसंचालक, माहिती, उप संचालक (आरोग्य), उप आयुक्त (ICDS), इ. संबंधीत अधिकाऱ्यांना मार्गदर्शन केले जाईल.

- **जिल्हास्तरीय कार्यशाळाः**

**दि.१९ ऑक्टोबर २०११ पर्यंत राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये** जिल्हा परिषद अध्यक्ष, उपाध्यक्ष, जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या उपस्थितीत **जिल्हा स्तरीय कार्यशाळांचे आयोजन** करुन त्या व्दारे जिल्हयातील सर्व तालुक्यांचे पंचायत समिती सभापती, जिल्हा परिषद विषय समिती सभापती, गट विकास अधिकारी, बाल विकास प्रकल्प अधिकारी, तालुका आरोग्य अधिकारी, वैद्यकिय अधिकारी, जिल्हा प्रशिक्षण संघ, प्रकल्प अधिकारी, जिल्हा माहिती अधिकारी, इत्यादिंना मार्गदर्शन केले जाईल.

- **तालुकास्तरीय कार्यशाळाः**

**दि.२६ ऑक्टोबर २०११ पर्यंत सर्व तालुक्यांमध्ये** पंचायत समिती सभापती, उपसभापती, गटविकास अधिकारी यांचे उपस्थितीत **तालुकास्तरीय कार्यशाळांचे आयोजन** करुन त्याव्दारे तालुक्यातील सर्व वैद्यकियं अधिकारी, ICDS पर्यवेक्षिका, विस्तार अधिकारी (पंचायत), जिल्हा परिषद सदस्य, पंचायत समिती सदस्य, सरपंच, ग्रामसेवक इत्यादींना मार्गदर्शन केले जाईल.

- **प्राथमिक आरोग्य केंद्र स्तरीय कार्यशाळा:**

**दि.२ नोव्हेंबर, २०११ पर्यंत सर्व प्राथमिक आरोग्य केंद्र कार्यक्षेत्रातील** वैद्यकिय अधिकारी व ICDS पर्यवेक्षिका यांच्या उपस्थितीत **प्राथमिक आरोग्य केंद्रस्तरीय कार्यशाळांचे आयोजन करुन त्याव्दारे** अंगणवाडी सेविका, आरोग्य कर्मचारी यांना अभियानाबाबत मार्गदर्शन केले जाईल. यासंदर्भात 'आशा' च्या मासिक बैठकीत हा विषय घेण्यात येऊन त्यांचा सहभाग घेता येईल.

- **ग्रामसभांचे आयोजन व कुपोषणमुक्त गाव कृती गटाचे गठन:**

**दि.८ नोव्हेंबर २०११ पर्यंत** कुपोषण मुक्तीसाठी संपूर्ण गांव सक्रिय सहभागी होण्यासाठी उपरोक्त कार्यशाळांव्दारे मिळालेली माहिती सर्व संबंधीत गावस्तरीय कर्मचारी व सरपंच यांनी गावाला द्यावयाची आहे. त्यासाठी ग्रामसभांचे आयोजन करुन त्यात माहिती देऊन चर्चा करावी आणि त्याद्वारे ग्रामपंचायत व ग्राम आरोग्य, पोषण, पाणी पुरवठा व स्वच्छता समितीची कुपोषणमुक्त गावासाठीची भूमिका निश्चित करण्यात यावी. तसेच या ग्रामसभांद्वारे प्रत्येक गावासाठी कुपोषणमुक्त गाव कृती गटाचे गठन करण्यात यावे. यामध्ये गावातील प्रतिष्ठित पुरुष, महिला, युवक, युवती, इत्यादींचा समावेश करता येईल. या गटाने कुपोषणमुक्त गावासाठी केल्या जाणाऱ्या व करावयाच्या प्रत्यक्ष उपाययोजनांचा पाठपुरावा करुन आपले गाव विहित कालावधीत कुपोषणमुक्त करावयाचे आहे.

- **मुलांचे वजन घेऊन अंतिम यादी तयार करणे:**

**दि.१० नोव्हेंबर २०११ पर्यंत** प्रत्येक गावातील ० ते ६ वर्ष वयोगटातील **बालकांची वजने सार्वजनिकरित्या** (चावडी/ग्रामपंचायत कार्यालय/इतर ठिकाणी) घेण्यात येऊन सर्व बालकांची प्रतवारी (Gradation) करुन त्यांची अंतिम यादी तयार करण्यात यावी. प्रत्येक बालक साधारण श्रेणीमध्ये (Normal Grade मध्ये) येण्यासाठी आवश्यक वजन संबंधीत बालकाच्या नावापूढे नमूद करावे.

- **कुपोषणाच्या कारणाची निश्चिती व वर्गीकरण:**

**दि.१३ नोव्हेंबर २०११ पर्यंत** उपरोक्त यादीनुसार साधारण श्रेणीतील बालके वगळून उर्वरीत सर्व बालके कुपोषित किंवा कमी वजनाची समजण्यात यावीत. या कुपोषित बालकांच्या **कुपोषणाची संभाव्य कारणे संबंधीत बालकाच्या कुटूंबातील व्यक्तींशी चर्चा करुन निश्चित** करण्यात यावीत व ती कारणे संबंधीत बालकांच्या नावासमोर नोंदवावीत. त्यानंतर कुपोषित बालकांच्या कुपोषणाची संभाव्य **कारणांची वर्गवारी आरोग्य विषयक समस्या, पोषण विषयक समस्या** अशी करण्यात यावी, जेणेकरुन त्यानुसार उपाययोजना करता येतील. या प्रक्रियेमध्ये सरपंच, ग्रामसेवक, अंगणवाडी सेविका, मदतनीस, आरोग्य कर्मचारी, शिक्षक, आशा, इत्यादींना सहभागी करण्यात यावे.

**ब) अभियानाची प्रत्यक्ष अंमलबजावणी:**

उपरोक्त प्रमाणे प्रत्येक ग्रामपंचायत कार्यक्षेत्रातील कुपोषित बालकांची संख्या व कुपोषणाची संभाव्य कारणे निश्चित झाल्यावर दि.१४ नोव्हेंबर २०११ (राष्ट्रीय बाल दिन) ते दि.७ एप्रिल, २०१२ (जागतिक आरोग्य दिन) या कालावधीमध्ये महाराष्ट्रातील सर्व ३३ ग्रामीण जिल्हयामध्ये राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम अभियानाची अंमलबजावणी करण्यात येईल.

सदर अभियान महाराष्ट्र शासनाचे महिला व बाल विकास विभाग, आरोग्य विभाग, आदिवासी विकास विभाग व ग्राम विकास विभाग यांच्या यंत्रणेद्वारे राबविण्याचे निश्चित करण्यात आले आहे. यामध्ये आयुक्त, महिला व बाल विकास, मिशन संचालक व राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान यांची भूमिका अत्यंत महत्वपुर्ण राहील.

**i) वातावरण निर्मीती करीता लाक्षणिक स्वरुपातील कृती कार्यक्रमः**

- **गावांची नोंदणी -** उपरोक्त पुर्व तयारीच्या आधारे राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम अभियानामध्ये सक्रिय सहभागी होण्यासाठी **गावांची नोंदणी दि.१४ नोव्हेंबर, २०११ या राष्ट्रीय बालदिनी परिशिष्ट-अ मध्ये** करण्यात येईल, यासाठी गावांनी पुढाकार घेणे आवश्यक आहे.

**दि.१४ नोव्हेंबर, २०११ रोजी गाव नोंदणी झाल्यानंतर त्या दिवसापासून ते दि.३० नोव्हेंबर २०११ या कालावधीमध्ये दररोज कुपोषणमुक्तीसाठी विविध उपक्रमांचे आयोजन** पुढील प्रमाणे करण्यात येईल. गावस्तरावर वातावरण निर्मीतीसाठी व जनजागृतीसाठी हे उपक्रम उपयुक्त राहतील. या विषयांव्यतिरिक्त या अभियानाच्या यशस्वितेसाठी उपयुक्त ठरु शकणाऱ्या नाविण्यपुर्ण बाबींचा/ विषयांचा समावेश करता येईल. उपरोक्त कालावधी दररोज पुढे दिलेल्या उपक्रमांचे आयोजन गांव पातळीवर केल्यास गावो-गावी कुपोषणमुक्तीची चळवळ मुळ धरेल. सदर उपक्रम दररोज करता आले नाहीत तरी, सदर उपक्रमांद्वारेच दि.१४ नोव्हेंबर, २०११ पासून ते दि. ७ एप्रिल, २०१२ पर्यंतच्या कालावधीत कुपोषणमुक्त गाव संकल्पना प्रत्यक्षात उतरेल.

**१. किशोरवयीन मुले / मुली यांच्या मार्फत मशालफेरी दिवसः**

या दिवशी कुपोषणमुक्त ग्राम अभियानाची सर्व गावकऱ्यांना माहिती व्हावी यासाठी सर्व गावांमध्ये किशोरवयीन मुले आणि मुली यांची मशालफेरी आयोजित करावी. मशानफेरीच्या माध्यमातून गावामध्ये कुपोषणमुक्त गाव यासाठी वातावरण निर्मिती करण्यात यावी.

**२. किशोरवयीन मुले / मुली समुपदेशन दिवस :**

या दिवशी किशोरवयीन मुर्लीना कुपोषणाची ची कारणे व उपाय या बाबतचे समुदेशन व त्यांची अभियानात भुमिका याबाबत मार्गदर्शन करण्यात यावे.

**३. नवविवाहितांचे समुपदेशन दिवस :**

या दिवशी नवविवाहित जोडप्यांना बाळ निरोगी व योग्य वजनाचे होण्यासाठी काय तयारी करावयाची या बाबतचे समुपदेशन यामध्ये करावयाचे आहे.

**४. गर्भवती मातांची तपासणी व समुपदेशन दिवस :**

या दिवशी गर्भवती स्त्रीयांची गर्भारपणाच्या नऊ महिन्याच्या कालावधीत कोणत्या तपासण्या आवश्यक आहेत, या कालावधीत कोणती काळजी घ्यावयाची आहे, या बाबतचे समुदेशन आणि सर्व गर्भवती महिलांची आरोग्य तपासणी करावयाची आहे.

**५. लोहगोळ्या दिवस :**

मनुष्यास कार्यक्षम राहण्यासाठी रक्ताची आवश्यकता असते. रक्तपेशी आहारातून मिळणाऱ्या लोहापासून तयार होतात. शरीरात लाल रक्त पेशी किती आहेत हे पाहण्यासाठी हिमोग्लोबीन मोजतात. आहारात लोहाची अत्यंत आवश्यकता आहे. परंतू बालके आणि स्त्रीयांमध्ये लोहाची कमतरता जास्त आहे. त्यामुळे त्यांना लोहगोळ्या नियमित दिल्या पाहिजे. हिमोग्लोबीन वाढल्याने मानवाची रोगप्रतिकारक शक्ती वाढते. या बाबतचे मागदर्शन या दिवशी करण्यात यावे.

**६. जंतनाशन दिवस :**

बालकांमध्ये वैयक्तिक अस्वच्छतेमुळे जंत होतात. जंतामूळे बालकाला दिलेला आहार बालकास पचत नाही त्यामुळे बालकाच्या वजनवाढीवर परीणाम होतो. यासाठी प्रत्येक बालकास जंतनाशन औषधी देणे आवश्यक आहे. दोन वर्षा खालील बालकास पातळ औषध तर २ ते ६ वर्ष वयोगटातील बालकास गोळी दिली जावी. जंतनाशन औषधीचा प्रभाव सहा महिन्या पर्यंत राहतो. दर सहा महिन्यानी बालकास हे औषध द्यावे. या बाबतचे मागदर्शन या दिवशी करण्यात यावे.

**७. जीवनसत्व अ दिवस :**

बाळाची रोग प्रतिकारकशक्ती वाढ यासाठी बाळास जीवनसत्व अ ची आवश्यकता असते. सर्वसाधारणपणे बालकांमध्ये जीवनसत्व अ ची कमतरता असते, त्यामुळे बालकास जीवनसत्व अ ची मात्रा दर सहा महिन्यांनी देणे आवश्यक आहे. या दिवशी जीवनसत्व अ ची मात्रा देण्यात यावी.

**८. स्तनदा माता समुपदेशन दिवस :**

बालकाच्या जन्मानंतर पहिले सहा महिने त्याच्या आयुष्याची अत्यंत महत्वाचा काळ असतो. या कालावधीत बालकास जंतूसंसर्ग होऊ नये, बाळ आजारी पडू नये, बाळाची वाढ आणि विकासाचा भक्कम पाया उभा राहावा, यासाठी पहिले सहा महिने निव्वळ स्तनपान बाळास आवश्यक आहे. यासाठी या दिवशी स्तनदामातांना स्तनपानाचे महत्व, स्तनपान किती काळ सुरू ठेवावयाचे या बाबत समुदेशन कर यात यावे.

**९. स्तनपान विषयक चर्चा दिवस :**

बालकाच्या जीवनामध्ये स्तनपानाचे महत्व खूप आहे, परंतू याबाबत समाजामध्ये अनेक गैरसमजूती आहेत. या बाबतची माहिती समाजातील सर्व घटकांना होणे आवश्यक आहे. यासाठी याविषयावर या दिवशी चर्चा करण्यात यावी.

**१०. माता समुपदेशन दिवस :**

स्तनपानासोबतच बालकांचा आहार, वैयक्तिक स्वच्छतेचे महत्व, बालकास करावयाचे लसीकरण या बाबतचे संपुर्ण माहिती मातांना असणे आवश्यक आहे.तसेच बालकांच्या वाढत्या वयानुसार बालकाला द्यावयाच्या आहाराची वारंवारीता आणि आहाराची गुणात्मकता या बाबत मार्गदर्शन या दिवशी मातांना करण्यात यावे.

**११. आहार प्रात्यक्षिक दिवस :**

कुटुंबामध्ये जो आहार शिजवला जातो त्याची गुणात्मकता कशी वाढवता येईल. चौरस आहार म्हणजे काय? तो कसा तयार करावयाचा? आहारामध्ये उष्मांक आणि प्रथिनांची गरज तसेच सूक्ष्म मूलद्रव्यांचे (जीवनसत्व-अ, क, झींक यासारखे) महत्व काय असते, त्यांची बालकांच्या वाढ आणि विकासासाठी गरज याबाबतचे समुपदेशन या दिवशी आहार प्रात्यक्षिकाच्या माध्यमातून सर्व गावकऱ्यांना करण्यात यावे.

**१२. परसबाग दिवस :**

कुटुंबाना रोजच्या आहारामध्ये सर्व प्रकराचे अन्नघटक सुक्ष्म मूल्यद्रव्यासह मिळावेत व ते सहज उपलब्ध व्हावेत, यासाठी कुटुंब ज्या ठिकाणी राहते, तेथेच परसबाग तयार करून त्यामध्ये उपयुक्त फळ झाडे, पालेभाज्या लावल्यास त्याचा उपयोग आहारामध्ये दररोज करता येणे शक्य होईल त्याचा परीणाम बालकाच्या वजनवाढीवर होईल. या दिवशी गावामध्ये घरोघरी परसबागा निर्माण करण्यास सुरुवात करावी.

**१३. आरोग्य तपासणी दिवस :**

बालकांचे आरोग्य योग्य आहे काय? यासाठी सर्व बालकांची नियमित आरोग्य तपासणी वैद्यकिय अधिकाऱ्यामार्फत करून घेण्यात यावी. तसेच गर्भवती स्त्रीया, किशोरवयीन मुलींची सुध्दा आरोग्य तपासणी करण्यात यावी. या दिवशी वैद्यकिय अधिकाऱ्यांच्या सहकार्याने गावातील सर्व लाभार्थ्यांना आरोग्य तपासणीस सुरुवात करावी.

**१४. वैयक्तिक स्वच्छता दिवस:**

बालकांमध्ये कुपोषण वैयक्तिक अस्वच्छते मुळे असते, त्यामुळे बालकास जंत होण्याची शक्यता असते, तसेच बालक जंतूसंसर्गाला बळी पडण्याची शक्यता जास्त असते. त्यामुळे बाळ निरोगी व सुदृढ राहण्यासाठी बाळाची वैयक्तिक स्वच्छता अत्यंत महत्वाची आहे. या दिवशी बाळाची नखे कापणे, दररोज स्नान घालून बाळ स्वच्छ ठेवणे, या गोष्टी करण्यात याव्यात.

**१५. प्रौढ (सासू, सासरे) यांच्याशी चर्चा दिवसः**

बालकाच्या संगोपनामध्ये बालकाच्या मातांसह घरातील इतर प्रौढ सदस्यांची मोठी भुमिका असते. या वडीलधारी घटकांचा घरातील निर्णय घेण्यावर मोठा सहभाग असतो. यासाठी कुपोषण आणि त्याचे दुरोगामी परिणाम याबाबत समुदेशन होणे गरजेचे असल्याने या दिवशी त्यांच्याशी चर्चा करण्यात यावी.

**१६. अनिष्ठ प्रथा, रूढी, चालिरीती यांचे पोषणस्थितीवर परिणाम यावर तज्ज्ञ मार्गदर्शन दिवसः**

बालकाच्या वाढ आणि विकासामध्ये कुटुंब आणि समाजामध्ये असलेल्या मोठ्याप्रमाणातील अनिष्ठ प्रथा, रूढी, चालिरीती यामुळे विपरीत परीणाम होत असतो. या अनिष्ठ रूढी, परंपरा कोणत्या त्यावर कशा प्रकारे मात करून वर्तणुकीत बदल करता येतो. या बाबतचे मागदर्शन या दिवशी करण्यात यावे.

**ii) लाभार्थी निहाय प्रत्यक्ष कार्यवाहीः**

उपरोक्त वातावरण निर्मितीकरीता लाक्षणिक स्वरुपातील कृती कार्यक्रम दि.१४ नोव्हेंबर, २०११ ते दि.३० नोव्हेंबर, २०११ या कालावधीत राबविल्यानंतर त्यानुसार **दि. १ डिसेंबर २०११ ते दि.७ एप्रिल २०१२ या कालावधीमध्ये** कार्यवाही करुन **राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम अभियानाची काटेकोर अंमलबजावणी** करावयाची आहे. गावातील ० ते ६ वर्षे वयोगटातील **मध्यम कमी वजनाची व तीव्र कमी वजनाची बालके, गरोदर माता, स्तनदा माता यांना** प्रत्यक्ष कोणत्या **सेवा** द्यावयाच्या आहेत **यासाठी परिशिष्ट-अ प्रमाणे कार्यवाही करावी.**

**७) अभियानात लोकसहभागः**

कुपोषण निर्मुलनाबाबत समाजाचा संपुर्ण सहभाग घेण्याची ही योग्य वेळ आहे. यासाठी मोहीम पध्दतीने (Campaign Mode) काम केल्यास **कुपोषण निर्मुलनाची लोकचळवळ** (People's Movement) उभी राहू शकते आणि ही काळाची गरज आहे. यासाठी समाजातील सर्व घटक जसे - शासकीय यंत्रणा, अशासकीय संस्था (NGO), खाजगी संस्था (Private Sector), सहकारी संस्था, लोकप्रतिनीधी, शालेय विद्यार्थी, महाविद्यालयीन युवक / युवती (राष्ट्रीय सेवा योजना), स्वयंसहायता गट (SHG), महिला मंडळे, युवक मंडळे, माता संघ (Mother groups), इ. यांचा सक्रीय सहभाग घेण्यात यावा. यासाठी ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्था (PRIs) जसे- जिल्हा परीषद, पंचायत समिती, ग्रामपंचायत यांचाही सक्रिय सहभाग व पुढाकार आवश्यक राहणार आहे.

**८) अभियानासाठी माहिती, शिक्षण व संवादाच्या (IEC) योग्य तंत्रांचा उपयोगः**

समाजामध्ये जाणीव-जागृती (Awareness)निर्माण होण्यासाठी व समाजाची मानसिकता बदलण्यासाठी (Behaviour Change) माहिती, शिक्षण व संवादाचे उपक्रम पुढीलप्रमाणे सर्व स्तरावर राबविण्याची गरज आहे. **पारंपारीक (Conventional) माध्यमे (उदा. लोककला पथके, इ.) यांचा वापर करण्याबरोबर अपारंपारीक (Non-conventional) माध्यमांमध्ये बदलत्या काळाशी सुसंगत तंत्रज्ञानाचा वापर (उदा. मोबाइल फोन, इ.) करुन समाजाच्या सर्व घटकांचा सहभाग घेण्यात यावा**. यासाठी एकात्मिक बाल विकास सेवा योजना (ICDS) व आरोग्य (Health) विभागांच्या निधीमधून पुढील प्रमाणे IEC उपक्रम राबविण्यात यावेत. तसेच महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांच्या यंत्रणेचा उपयोग या अभियानाबाबत मोठयाप्रमाणावर जनजागृतीसाठी करण्यात यावा.

✓ **राज्यस्तर (State Level):**

- प्रिंट मीडीया, वृत्तपत्रे, नियतकालीके (लोकराज्य), वृत्तपत्रीका (Newsletter).
- इलेक्ट्रॉनिक मीडीया- रेडीओ, टी.व्ही., एस्.एम्.एस्./व्हाईस कॉलींग, बस स्टॅंड अनाउसमेंट.

यासाठी जाहिरात संस्था (Ad. Agency) ची मदत घेता येईल. (याकरीता पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचा दि.२९ जानेवारी, २०११ च्या शासन निर्णयाचा उपयोग करावा.)

✓ **जिल्हास्तर (District Level):**

- लोक कलाकार, किर्तनकार, इ. च्या कार्यशाळा (Workshops) घेवून त्यांच्या व्दारे समाजाचे प्रबोधन (Social Mobilization) करणे.
- चित्रपटगृहांव्दारे ॲड फिल्म/डॉक्युमेंटरी दाखविणे.
- लोकल केबल टी.व्ही, एफ्.एम्. रेडीओ वरुन संदेश प्रसारण करणे.

✓ **तालुकास्तर (Block Level):**

- जत्रा, यात्रा, आठवडीबाजार येथे प्रदर्शनाव्दारे (Exhibition) माहिती देणे.

✓ **गावस्तर (Village Level):**

- लोककला कार्यक्रम (कलापथके), किर्तन, Inter Personal Communication (IPC) उपक्रमांव्दारे समाजाचे प्रबोधन (Social Mobilization) करणे.
- गावेगावी फिल्म शो (Film Show) चे आयोजन करणे.

✓ **कुटुंबस्तर (Family Level):**

- गृहभेटी (Home Visits) व्दारे मार्गदर्शन (Counseling) करणे इ.

## ९) अभियानाचे संनियंत्रण व मूल्यमापन :

अभियानाचे संनियंत्रण व मुल्यमापन विविध स्तरांवरुन पुढे दिलेल्या समित्यांमार्फत करण्यात येईल.

**अ) राज्यस्तरीय संनियंत्रण व मूल्यमापन समिती:**

| | | |
|---|---|---|
| १. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | - | अध्यक्ष |
| २. अतिरिक्त मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य | - | सदस्य |
| ३. प्रधान सचिव, महिला व बाल विकास | - | सदस्य |
| ४. प्रधान सचिव, आदिवासी विकास | - | सदस्य |
| ५. सचिव, ग्राम विकास | - | सदस्य |
| ६. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन | - | सदस्य सचिव |
| ७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क | - | सदस्य |
| ८. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना | - | सदस्य |
| ९. मिशन संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य मिशन | - | सदस्य |

**ब) विभागस्तरीय संनियंत्रण व मूल्यमापन समिती:**

| | | |
|---|---|---|
| १. विभागीय आयुक्त | - | अध्यक्ष |
| २. अतिरिक्त आयुक्त, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | - | सदस्य |
| ३. विभागीय उप संचालक, सार्वजनिक आरोग्य | - | सदस्य |
| ३. उप आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना | - | सदस्य |
| ४. उपसंचालक, माहिती व जनसंपर्क | - | सदस्य |
| ६. उपआयुक्त (विकास) | - | सदस्य सचिव |

**क) जिल्हास्तरीय संनियंत्रण व मूल्यमापन समिती:**

| | | |
|---|---|---|
| १. जिल्हाधिकारी | - | अध्यक्ष |
| २. मुख्य कार्यकारी अधिकारी | - | सहअध्यक्ष |
| ३. जिल्हा आरोग्य अधिकारी | - | सदस्य |

४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प - सदस्य
५. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (महिला व बाल विकास) - सदस्य सचिव
६. जिल्हा माहिती अधिकारी - सदस्य

**ड) तालुकास्तरीय संनियंत्रण व मूल्यमापन समिती:**

१. गट विकास अधिकारी - अध्यक्ष
२. तालुका आरोग्य अधिकारी - सदस्य
३. बाल विकास प्रकल्प अधिकारी - सदस्य सचिव
४. प्रकल्प निरिक्षक, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प - सदस्य
५. तालुका पंचायत अधिकारी - सदस्य

**इ) ग्रामस्तरावर लोकांद्वारे संनियंत्रण:**

अभियान कालावधीमध्ये गरोदर माता, स्तनदा माता व ० ते ६ वर्षे वयोगटातील बालके यांची वजने व त्यांना देण्यात येणाऱ्या सेवा **ग्रामस्तरावर लोकांद्वारे संनियंत्रण करण्यासाठी सोबतची प्रपत्रे- १, २ व ३** उपयुक्त राहतील, त्यांचा उपयोग करण्यात यावा.

**१०) राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त गाव पुरस्कारासाठी गाव निवडीची कार्यपध्दती:**

प्रत्येक ग्रामपंचायतीने आपले गाव/गावे कुपोषणमुक्त करण्यासाठी प्रयत्न करणे गरजेचे आहे. हा एक महत्वाचा कार्यक्रम असल्यामुळे प्रत्येक ग्रामपंचायतीने गाव पातळीवर सर्व कर्मचाऱ्यांच्या व संस्थांच्या मदतीने आपले गाव / गावे कुपोषणमुक्त करण्यासाठी मोहिम पध्दतीने प्रयत्न करावयाचे आहे. अंगणवाडी सेविका व आरोग्य कर्मचारी यांनी नेमून दिलेली कामे व उदिष्टे पुर्ण करावीत व त्याना ग्रामपंचायतीने सहकार्य व मार्गदर्शन करावे. जी गावे कुपोषित बालकांची संख्या शुन्यावर आणण्यात यशस्वी होतील म्हणजेच ज्या गावातील ० ते ६ वयोगटातील सर्व बालके साधारण श्रेणीमध्ये आणतील त्याच गावांनी **दि.१४ नोव्हेंबर २०११ ते दि.७ एप्रिल २०१२ या कालावधीत केलेल्या कामाची माहिती परिशिष्ट-क मध्ये** भरुन परिशिष्ट-अ सह तसा अहवाल **दि.१० एप्रिल, २०१२ पर्यंत गट विकास अधिकारी यांच्याकडे** सादर करावा.

तालुकास्तरीय संनियंत्रण व मुल्यमापन समितीने सर्व ० ते ६ वर्षे वयोगटातील बालके पुर्णत: हाताळलेल्या गावांची परिशिष्ट-अ व क मध्ये भरलेल्या **माहितीची पडताळणी करुन त्याचा अहवाल परिशिष्ट-ड मध्ये** दिलेल्या विहित नमुन्यानुसारच परिशिष्ट-अ व क सह दि.२० एप्रिल, २०१२ पर्यंत **मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचेकडे** सादर करावा.

जिल्हा स्तरीय संनियंत्रण व मुल्यमापन समितीने जिल्हा स्तरावर आलेल्या प्रस्तावांची छाननी करावी. पात्रता पुर्ण केलेल्या गावांना भेटी देऊन अंतिम निर्णय घ्यावा. जिल्ह्यातील कुपोषण मुक्त गावांची निवड पुरस्कारासाठी करावी. या समितीचा निर्णय अंतिम असेल. **पुरस्कार वितरण समारंभ दि.१ मे २०१२ रोजी मा.पालकमंत्री यांच्याहस्ते शासकिय कार्यक्रमात घेण्यात यावा.** राज्यस्तरीय पुरस्कार वितरण कार्यक्रमाबाबत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येईल.

**११) निधीची उपलब्धता:**

अभियान अंमलबजावणीसाठी महिला व बाल विकास विभागाच्या किंवा / व एकात्मिक बाल विकास सेवा योजनेच्या IEC निधीतून व स्थानिक स्वराज्य संस्था जसे जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्राम पंचायत यांच्या १०% महिला व बाल विकास निधीतून या अभियानासाठी खर्च करावा.

राजमाता जिजाऊ कुपोषणमुक्त ग्राम पुरस्कारासाठी निधी तरतुदीचा आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल.

सदर शासन निर्णय वेबसाईट www.maharashtra.gov.in वर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक 201109271545554001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(रत्नाकर गायकवाड)
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतिः**

मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (अन्न व नागरी पुरवठा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (रोजगार हमी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. राज्यमंत्री, (महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, सहकार विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, कुटूंब कल्याण, मंत्रालय, मुंबई.
सचिव, वैद्यकीय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, रोजगार व स्वयंमरोजगार, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, राजमाता जिजाऊ माता- बाल आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंवई.
मिशन संचालक , राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, आरोग्य भवन, मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, सार्वजनीक आरोग्य संचालनालय, मुंबई.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
उपमुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण) जिल्हा परिषद, सर्व.
जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
प्रधान सचिव, महिला व बाल विकास यांचे स्वीय सहाय्यक.
युनिसेफ, मुंबई. (पत्राव्दारे).
सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग.
निवड नस्ती कार्यासन - ५.

## परिशिष्ट - अ

## कुपोषणमुक्त गावासाठी मार्गदर्शन सूचना

## बालकांचे वजन कमी होण्याची कारणे व निदान

आपणास माहितीच आहे की बालकांचे वजन वयाप्रमाणे सामान्यपेक्षा कमी झाले की त्यांना कमी वजन (MUW) आणि अधिकच कमी झाले तर तीव्र कमी वजन (SUW) म्हणून ओळखले जाते. अशा पध्दतीने मुले बरेच काळ कमी वजनात राहीली तर ती कुपोषित होतात. कुपोषित मुले ओळखण्यासाठी आपण उंची किंवा दंड घेर माप (MUAC) प्रमाणे वजन घेतो. याप्रमाणे वजन कमी असेल तर सौम्य कुपोषण (MAM) आणि वजन अधिकच कमी झाले तर तीव्र कुपोषण (SAM) असे म्हणतो. अर्थात MUW आणि MAM वेगवेगळया बाबी आहेत. तसेच SUWआणि SAM सुध्दा सारखेच नाहीत.

आपण SAM मुले कमी करण्यासाठी आजारी नसलेल्या मुलांसाठी ग्राम बाल विकास केंद्र (VCDC) तर आजारी मुलांसाठी बाल उपचार केंद्र (CTC) चालवतो. तसेच SUW मुले कमी करण्यासाठी अंगणवाडीमध्ये अशा मुलांना एक युनिट अधिक आहार देतो. याशिवाय अन्य मुलांसाठी काही विशेष करत नव्हतो. वजन कमी होण्याचे कारण योग्य प्रकारे समजल्याने वजन वाढविण्याची उपाययोजना सुध्दा सोपी दिसते. आपल्या राज्यात एक सुध्दा कुपोषित किंवा कमी वजनाचे मूल राहू नये किंवा शंभर टक्के मुले सामान्य श्रेणीत राहावीत यासाठी ही घडीपत्रिका तयार करण्यात आली आहे. आशा आहे की आपण याचा योग्य वापर करुन आपल्या क्षेत्रातील सर्व मुलांना सामान्य श्रेणीत आणाल.



**वरील चित्रावरुन स्पष्ट आहे की, कुपोषण होण्याचे 4 प्रमुख कारणे (घराची दारे) आहेत.**

1. कमी वजनाची मुले जन्माला येणे.
2. आहार देण्याच्या चुकीच्या पद्वती.
3. अतिसार आणि पाण्याने होणारे अन्य आजार.
4. न्यूमोनिया.

त्याशिवाय कुपोषणाच्या घराला 6 भुयारी मार्गे आहेत. ते खालील प्रमाणे.

1. लोहाची कमतरता
2. आयोडीनची कमतरता.
3. जीवनसत्व 'अ' ची कमतरता.
4. सर्व लसीकरण न होणे.
5. झिंकची कमतरता.
6. मुलांना जंत होणे.

**पहिला दरवाजा बंद करणे (कमी वजनाची मुले न होऊ देणे) यासाठीः**

1. किशोरवयीन मुली व लग्न न झालेल्या महिला.
2. गरोदर महिला यांचे
   i) BMI - Body Mass Index वाढविणे म्हणजेच त्यांचे वजन उंचीच्या मानाने योग्य ठेवणे. ती 18 पेक्षा कमी असू नये.
   ii) Hb - हिमोग्लोबीन प्रतिशन मुलींसाठी 11 पेक्षा तर गरोदर स्त्रियांसाठी 13 पेक्षा कमी असू नये. यासाठी

1. सर्व मुली आणि महिला आठवडयातून एकदा तर गरोदर स्त्रिया सतत 100 दिवस लोहयुक्त गोळया खातील हे पाहणे.
2. सर्वांना एकवेळा अधिक जेवण देणे.

**बाकीची तीन दारे बंद करण्यासाठी खालील दशपदी पाळावी.**

1. चिकाचे दूध जन्मानंतर एका तासात पाजणे.
2. जन्माच्या 6 महिनेपर्यंत फक्त आईचे दूध पाजणे.
3. 6 महिने झाल्यावर आईच्या दूधासह पूरक आहार सुरु करणे.
4. पोषण आहारामध्ये सर्व मुख्य आणि सुक्ष्म तत्वे उपलब्ध असणे.
5. पोषण आहारची वारंवारिता 3 ते 8 वेळा ठेवणे.
6. रक्तातील लोहाचे प्रमाण वाढविण्यासाठी गोळी किंवा स्पिंकल देणे.
7. मुले 9 महिने पुर्ण झाल्यावर जीवनसत्व 'अ' दर 6 महिन्यांनी देणे.
8. आयोडीनयुक्त मीठाचे सेवन.
9. सर्व लसीकरण.

10. बाळ व अन्य व्यक्तींच्या विष्ठेची योग्य विल्हेवाट जोपर्यंत होत नाही असे वाटल्यास,

अ) 24 महिने वयापर्यंत बाळाला उकळलेले पाणी पाजणे.

ब) दर 6 महिन्याला जंतनाशक औषध देणे.

क) हात साबणाने धुवुन बाळास पाणी /औषध पाजणे किंवा भरविणे.

कुपोषण संपविण्यासाठी एखादे मूल कुपोषित होण्याअगोदर त्याची वाढ थांबते किंवा त्याचे वजन घसरते (Growth Faltering आणि Growth Decline) अशा वेळी उपरोक्त 10 पैकी काही बाबीमध्ये चूक होत असेल तर दूरुस्त करावे. बाळाच्या जेवणाची अधिक काळजी घ्यावी. त्यांच्या पोटात आधीपेक्षा अधिक अन्न जाईल यासाठी सर्व उपाययोजना (मुलांच्या आवडीचे, अधिक वेळा, अधिक मात्रा, सर्व तत्वे असतील असे मिक्स करावे). बाळ आजारी असेल तर लगेच त्याचा उपचार करावा.

**मुलांचे वजन आधीच कमी झाले असल्यास करावयाची कृती :**

**कमी वजनाची (MUW) आणि तीव्र कमी वजनाच्या (SUW) बालकांसाठी आहार**

हया बालकांना:

1. वजनात वाढ होण्यासाठी अधिक उष्मांकांची
2. शरीराची योग्य पध्दतीने वाढ होण्यासाठी प्रथिनांची
3. रोग प्रतिकार शक्तीची/क्षमतेची वाढ होण्यासाठी जीवनसत्वांची गरज असते. त्यामुळे अशा बालकांच्या जेवणात खालील प्रमाणे करण्यात बदल करण्यात यावे:

**उष्मांक वाढविण्यासाठी:**

त्यामुळे अशा बालकांच्या जेवणात खालील गोष्टी अतिरिक्त प्रमाणात मिसळल्यास उष्मांक वाढविण्यासाठी मदत होते : तेल, तेलबिया,साखर,गूळ,केळी,बटाटे,रताळे तूप इत्यादी.

**प्रथिने वाढविण्यासाठी:**

अ) आहारामध्ये पातळ वाराणापेक्षा घट्ट डाळीचा वापर करावा.

ब) विविध डाळींचा वापर करणे.

क) मांसाहारी पदार्थ, अंडी, दुध आणि दुग्धजन्य पदार्थ इत्यादी

ड) प्रक्रिया केलेले सोयाबीन

**सोयाबीन प्रक्रियेची पध्दत खालील प्रमाणे आहे :**

1) सोयाबीन रात्रभर पाण्यात भिजवावे.

2) दुस-या दिवशी सकाळी त्यावरचे साल काढून पाणी फेकून द्यावे.

3) सावलीत सुकवून खमंग भाजून घ्यावे.

4) गरजेनुंसार वळवून 10 किलो मध्ये 1 किलो अश्या प्रमाणात वापरणे.

**रोग प्रतिकार शक्ती /क्षमता वाढविण्यासाठी:**

**लोह वाढविण्यासाठी:**

अ) आळीव, हिरव्या पालेभाज्या, सोयाबीन, बाजरी, मांसाहारी पदार्थ, अंडी, शेपू इत्यादी

ब) अन्न शिजवताना लोखंडी भांडयांचा वापर करणे.

क) आठवडयातून एकदा लोहयुक्त गोळयांचे सेवन करणे.

ड) आहारामध्ये आवळा, पेरु, लिंबू, संत्री, मोसंबी, शेवगा, टोमॅटो, असे जिवनसत्व-क युक्त पदार्थांचा समावेश केल्यामुळे पदार्थातील लोहाचे शोषण होण्यास मदत होते.

इ) जेवण्याच्या आधी, जेवणासोबत किंवा जेवणानंतर किमान एक तास चहा अथवा कॉफी यांचे सेवन करु नये. असे केल्यास पदार्थांतील लोहाचे शोषण होत नाही.

**आयोडीन वाढविण्यासाठीः** आहारामध्ये नेहमी आयोडीन युक्त मिठाचाच वापर करावा.

**जीवनसत्व 'अ' वाढविण्यासाठीः**

अ) गाजर, पपई, लाल भोपळा, आंबट चुका, चंदन बटवा, नागवेलीची पाने, कोंथिबीर, चवळीची पाने, कडीपत्ता, शेवग्याची पाने, मेथी, शेलगामची पाने इत्यादी.

ब) मुले 9 महिने पुर्ण झाल्यावर दर सहा महिन्यानी जीवनसत्व अ चा डोस देणे.

**कॅल्शिअम वाढविण्यासाठीः**

अ) नाचणी, दूध व दूग्धजन्य पदार्थ, तेलबिया, पाले भाज्या, सुके मासे इत्यादी.

**वारंवारीताः** लहान बालकांच्या पोटाचा आकार लहान असल्यामुळे त्यांना दिवसातून 6 वेळा आहार देणे.

## सौम्य कुपोषित (MAM) आणि तीव्र कुपोषित (SAM) बालकांसाठी खालील प्रमाणे अतिरीक्त बाबी कराव्यात

1. दिवसभरातून 8 वेळा आहार देणे.
2. सूक्ष्म जीवनसत्वे असलेले द्रव्य टॉनिक स्वरुपात देणे.
3. अ) मोड आलेले कडधान्याचा वापर करणे.

   ब) अधिक काळजीसाठी अमायलेजयुक्त पीठ देणे.

   **अमायलेजयुक्त पीठ बनवण्याची प्रक्रिया खालील प्रमाणे आहे.**

   - गहू आणि मूग वेगवेगळे रात्रभर पाण्यात भिजवावे.
   - नंतर 24 तास मूग मोड येण्यासाठी बांधून ठेवणे, तसेच गहू 48 तास मोड येण्यासाठी बांधून ठेवावे.
   - मोड आलेले गहू आणि मूग वाळवा आणि नंतर मंद आचेवर खमंग भाजून वेगवेगळे दळावे.
   - हया पिठाचा 4:1 किंवा 3:1 हया प्रमाणात पाक कृतीत वापर करावा.

**टिपः** पावसाळयात आणि हिवाळयात मूग व गव्हास मोड येण्यास जास्त वेळ लागू शकतो.

**बालके आजारी पडू नयेत म्हणून खालील गोष्टी कराव्यातः**

- बालकांना पिण्यास उकळून थंड केलेले पाणी द्यावे.
- बालकांना जेवण भरवण्यापूर्वी साबणाने हात स्वछ धुवावे.
- गावामध्ये नेहमी स्वच्छता असेलच असे नाही म्हणून सहा महिन्यांनी बालकांना जंत नाशक औषध देणे.

- बालकांच्या विष्ठेची योग्य विल्हेवाट लावावी.

**मुले आजारी पडल्यास:**

- मुले आजारी पडल्यावर सुध्दा आधी प्रमाणे जेवण देत रहावे.
- आजारातून बरे झाल्यावर त्या बालकास एक वेळेस जास्त आहार देणे.
- अतिसार झाल्यानंतर झिंकचा डोस द्यावा.

---

**परिशिष्ट - ब**

**गाव नोंदणीच्या वेळीचा अहवाल**

(हा अहवाल ऑगस्ट, २०११ चा मासिक अहवालातील आकडेवारीवरुन घेण्यात यावा)

गावातील ० ते ६ वर्षे वयोगटातील बालकांची माहिती

**गावाचे नांव: ............ ग्रामपंचायत: ............ प्रकल्प: ............ तालुका: ............ जिल्हा: ............**

| अ.क्र. | अंगणवाडी क्रमांक | ० ते ६ वर्षे वयोगटातील (वया नुसार वजनाप्रमाणे) | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | एकूण बालके संख्या | साधारण बालके संख्या (Normal) | मध्यम कमी वजनाची बालके संख्या (MUW) | तीव्र कमी वजनाची बालके संख्या (SUW) | साधारण (Normal) बालकांची टक्केवारी |
| | | | | | | |
| एकूण | | | | | | |

स्वाक्षरी
अंगणवाडी सेविका
गाव: ............

स्वाक्षरी
आरोग्य कर्मचारी
गाव: ............

स्वाक्षरी
ग्रामसेवक...... सरपंच ........
ग्रामपंचायत: .........तालुका:.........जिल्हा: .........

## परिशिष्ट- क

## अभियान संपल्यानंतर सादर करावयाचा अहवाल

गावातील ० ते ६ वर्षे वयोगटातील बालकांची माहिती

**गावाचे नांवः ............ ग्रामपंचायतः ............ प्रकल्पः ............ तालुकाः ............ जिल्हाः ............**

| अ.क्र. | अंगणवाडी क्रमांक | ० ते ६ वर्षे वयोगटातील (वया नुसार वजन) | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | एकूण बालके संख्या | साधारण बालके संख्या (Normal) | मध्यम कमी वजनाची बालके संख्या (MUW) | तीव्र कमी वजनाची बालके संख्या (SUW) | साधारण (Normal) बालकांची टक्केवारी |
| | | | | | | |
| एकूण | | | | | | |

स्वाक्षरी
अंगणवाडी सेविका
गावः ............

स्वाक्षरी
आरोग्य कर्मचारी
गावः ............

स्वाक्षरी
ग्रामसेवक...... सरपंच ........
ग्रामपंचायतः ..........तालुकाः.........जिल्हाः .........

---

## परिशिष्ट- ड

## पडताळणी अहवाल

गावातील ० ते ६ वर्षे वयोगटातील बालकांची माहिती

**गावाचे नांवः ............ ग्रामपंचायतः ............ प्रकल्पः ............ तालुकाः ............ जिल्हाः ............**

| अ.क्र. | अंगणवाडी क्रमांक | ० ते ६ वर्षे वयोगटातील (वया नुसार वजन) | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | एकूण बालके संख्या | साधारण बालके संख्या (Normal) | मध्यम कमी वजनाची बालके संख्या (MUW) | तीव्र कमी वजनाची बालके संख्या (SUW) | साधारण (Normal) बालकांची टक्केवारी |
| | | | | | | |
| एकूण | | | | | | |

**टिपः** अति दुर्धर रोगाने पिडीत बालकांची योग्य हाताळणी झाली असल्याची खात्री तालुकास्तरीय संनियंत्रण व मुल्यमापन समितीने करुन अशा बालकांना अपवाद करुन निर्णय घ्यावा.

स्वाक्षरी
सरपंच
ग्रा.पं : .................

स्वाक्षरी
सर्व सदस्य
तालुका स्तरीय संनियंत्रण व मुल्यमापन समिती

## ० ते ६ वर्षे वयागटातील बालकांचे वजन सनियंत्रण प्रपत्र-१

| अ.क्र | बालकाचे नाव | जन्म दिनांक | दि.१४ नोव्हेंबर रोजी वय (महिन्यात) | वजन (ग्रॅम मध्ये) | लांबी / उंची सें.मी. | पोषण श्रेणी | | | | | अपेक्षित आदर्श वजन | अपेक्षित आदर्श वजनासाठी लागणारे वजन (ग्रॅम) | डिसेंबर २०११ अखेर आदर्श वजनासाठी अपेक्षित वजन | जानेवारी २०१२ अखेर आदर्श वजनासाठी अपेक्षित वजन | फेब्रु. २०१२ अखेर आदर्श वजनासाठी अपेक्षित वजन | मार्च २०१२ अखेर आदर्श वजनासाठी अपेक्षित वजन | दि. ७ एप्रिल २०१२ अखेर आदर्श वजनासाठी अपेक्षित वजन |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | साधारण | मध्यम कमी वजनाचे | तीव्र कमी वजनाचे | सौम्य कुपोषित (MAM) | तीव्र कुपोषित (SAM) | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |

# ० ते ६ वर्षे वयागटातील बालकांसाठी सेवा सनियंत्रण प्रपत्र-२

| अ.क्र | बालकाचे नांव | पोषण गट | स्तनपानात आवश्यक सुधारणा (० ते २ वर्षे) | आहारात सुधारणा | | | जंत नाशक औषधे (१ ते ६ वर्षे) | जीवनसत्व अ | इतर जीवनसत्वे | लोहयुक्त औषधे (१ ते ६ वर्षे) | लसीकरण | उकळलेले पाणी (६ महिने ते २ वर्षे) | साबण पाण्याने हात धुणे | घरांतर्गत परीसर स्वच्छता | आयोडिन युक्त मीठाचा वापर | बाजारी आहाराचा प्रतिबंध (बिस्कीट, चॉकलेट इ) | मातांचे आहार प्रशिक्षण | कुटुंबातील इतर व्यक्तींची मानसिकता तयार करणे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | वारंवारता | जास्तीच्या अन्न घटकाचा समावेश | बाळ कोपरा | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |

## गरोदर मातांसाठी सेवा सनियंत्रण प्रपत्र-३

| अ.क्र. | गरोदर मातेचे नाव | गरोदरपणाचा कालावधी | शेवटच्या मासिक पाळीचा दिनांक | प्रसुतीचा अपेक्षित दिनांक | दिनांक वजन | वजनवाढीचा दर | लोहयुक्त गोळया | वैद्यकिय तपासणी | रक्तदाब | सोनोग्राफी | हिमोग्लोबीन तपासणी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | | | | |